**कृति आराखडयाअंतर्गत कृषि प्रशिक्षण संस्थांचे बळकटीकरण करणे ही १००% केंद्र पुरस्कृत योजना राज्यात सन २०१०-११ मध्ये राबविण्यास वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

कृषि,पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांक: वनास ६५१०/प्र.क्र. १६०/३-अे
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २४ जुलै , २०१०.

**संदर्भ :-** १) केंद्रीय कृषि मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.६-३/२०१०-एमएम, दि. ११ जुन, २०१०
२) केंद्रीय कृषि मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.६-६/२०१० -एमएम, दि. १६ जुन, २०१०
३) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्रमांक जा.क्र./कृआ/कृप्रसंब/प्रस्ताव/विप्र-५/४०३/२०१०-११/१०, दि.२० जुन, २०१०.
४) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांक वनास ६५१०/प्र.क्र. १६०/३-अे,दि.२४ जुन २०१०.

**प्रस्तावना :-**

राज्यातील कृषी विकासाच्या कार्यक्रमाचे महत्त्व लक्षात घेऊन कृषी आणि कृषिशी निगडित असलेल्या विभागातील संबंधित अधिकारी / कर्मचारी यांना आधुनिक तंत्रज्ञानाचे प्रशिक्षण देण्याच्या उद्देशाने वसंतराव नाईक राज्य कृषी व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर आणि सदर संस्थेच्या ७ संलग्न विभागीय कृषि व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था पुणे, कोल्हापूर, औरंगाबाद, अमरावती, नागपूर, नाशिक व खोपोली (जि. रायगड) या संस्थांची स्थापना करण्यात आली असून सदर संस्थांच्या बळकटीकरणाचा कार्यक्रम **कृषि प्रशिक्षण संस्थाचे बळकटीकरण करणे** या १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजनेखाली घेण्यात येतो. केंद्रीय कृषि मंत्रालयाने त्यांच्या संदर्भाधीन दि.११ जुन, २०१० च्या पत्रान्वये दिलेल्या मान्यतेनुसार ही योजना सन २०१०-११ मध्ये राबविण्यास **संदर्भाधिन दि.२४ जून,२०१० च्या शासन निर्णयान्वये प्रशासकिय** मान्यता देण्यात आली आहे. केंद्र शासनाने संदर्भाधिन दि.१६ जून,२०१० च्या पत्रान्वये कृति आराखडयातील पहिल्या हप्त्याचा रु.४४५५.०८५ लक्ष निधी राज्य शासनास मुक्त केला आहे. त्या अनुषंगाने प्रस्तुत योजनेस **वित्तीय** मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

**राज्यातील कृषि प्रशिक्षण संस्थांचे बळकटीकरण करणे** ही १००% केंद्र पुरस्कृत योजना कृति आराखडया अंतर्गत सन २०१०-११ मध्ये राबविण्यास केंद्रीय कृषी मंत्रालयाने संदर्भाधीन दि. ११जुन, २०१० च्या पत्रान्वये **रु. ३००.०० लक्ष (तीनशे लक्ष)च्या** कार्यक्रमास प्रशासकिय मान्यता दिली आहे. केंद्र शासनाच्या मान्यतेच्या अधिन राहून कृषि आणि कृषीशी निगडीत विभागातील अधिकारी/कर्मचारी यांना प्रशिक्षण देण्याकरिता वसंतराव नाईक राज्य कृषी व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर ही शिखर संस्था आणि सदर संस्थेच्या ७ संलग्न विभागीय कृषि व्यवस्थापन प्रशिक्षण संस्थांच्या बळकटीकरणासाठी कृषि प्रशिक्षण संस्थांचे बळकटीकरण करणे ही १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना राज्यात सन २०१०-११ मध्ये राबविण्यास या शासन निर्णयान्वये पहिल्या हप्त्यात **रु.१४०.०० लक्ष (रुपये एक कोटी चाळीस लक्ष) च्या** कार्यक्रमास **वित्तीय** मान्यता देण्यात येत आहे.

**२.** **कृषि प्रशिक्षण संस्थांचे बळकटीकरण करणे** ही १००% केंद्र पुरस्कृत योजना राज्यात राबविण्याकरिता प्रमुख घटक संदर्भाधीन दि.२४ जून,२०१० च्या शासन निर्णयात दर्शविल्यानुसार राहतील.

**३.** केंद्रीय कृषि मंत्रालयाने दिलेल्या मार्गदर्शक सूचना , मार्गदर्शक तत्वे तसेच शासनाचे प्रचलित नियम व अटी यानुसार खर्च करण्यात यावा. वरील मंजूर केलेला निधी खर्च करण्यास संचालक (विस्तार व प्रशिक्षण) , कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणूनघोषित करण्यात येत आहे. राज्यातील संबंधित कृषि सहसंचालक

अथवा अन्य अधिकारी यांना आवश्यकतेनुसार या मंजूर निधीचे वाटप संगणकीय अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे करण्यास आणि त्याच्या वापराबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यास संचालक (विस्तार व प्रशिक्षण) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

**४.** केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना, अटी व शर्तीनुसार विविध प्रशिक्षण कार्यक्रम आयोजित करणे याकरिता संबंधित अधिकाऱ्यांना आवश्यक त्या सूचना संचालक, (विस्तार व प्रशिक्षण) यांनी संचालक, वनामती तसेच सर्व संबंधित प्राचार्य रामेती यांच्या समन्वयाने निर्गमित कराव्यात. सदर निधीचे वाटप वित्त विभागाने विकसित केलेल्या संगणकीय अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत करण्यात यावे. निधी खर्च करतांना मासिक कॅश फ्लोच्या मर्यादेत राहील याची जबाबदारी संचालक (विस्तार व प्रशिक्षण ) यांची राहील.

**५.** सन २०१०-११ मध्ये याप्रित्यर्थ होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली मंजूर केलेल्या निधीतून खर्ची टाकण्यात यावा:-

**मागणी क्रमांक डी -३**

**२४०१ पीक संवर्धन, १०९ विस्तार व प्रशिक्षण**

**पंचवार्षिक योजनांतर्गत योजना /केंद्र पुरस्कृत योजना**

**( ०१ ) (४८) कृषि प्रशिक्षण संस्थांचे बळकटीकरण करणे (१००% कें.पु.यो.)**

**३१ सहाय्यक अनुदान (२४०१ ३९२१)**

**६.** हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१५३/१०/व्यय-१, दिनांक १७ जुलै,२०१० अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार व अपर मुख्य सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

**७.** सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००७२८१४५०१०००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**( वीणा राऊत )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**प्रति,**

कृषी आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, ६२/१, सिव्हील लाईन्स, नागपूर
संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० जादा प्रतींसह)
सर्व संचालक / सर्व सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व विभागीय कृषी सहसंचालक,
कृषि सहसंचालक (विस्तार), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,
सर्व प्राचार्य, प्रादेशिक कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, चऱ्होली, खोपोली, नाशिक, अमरावती, औरंगाबाद, नागपूर व कोल्हापूर
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर,

सर्व विधानमंडळ सदस्य, विधान मंडळ सचिवालय, मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
सहसंचालक, लेखा व कोषागारे (संगणक कक्ष), नवीन प्रशासन भवन, मुंबई,
सर्व  जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व सहसचिव / उप सचिव / अवर सचिव (कृषी विभाग),कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव,न
नियोजन विभाग ( का.१४३१ ) / वित्त विभाग ( १३ )
कक्ष अधिकारी, १५-अे, २-अे, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,